**सार्वजनिक बांधकाम विभागातील बांधकाम विषयक कामे करतांना तसेच इमारतींची दुरुस्ती व देखभाल करताना अनुसरायची पध्दती:**
**इमारतींची छापील नोंदवही** (Printed register of buildings) **मध्ये बांधकाम व दुरुस्तीबाबत नोंद घेण्याच्या कार्यपद्धतीचे संगणकीकरण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी-०३/२०१५/प्र.क्र.६०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३०/६/२०१५

वाचा :- १) सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.३७७ मधील सूचना.
२) इमारतींच्या देखभाल व दुरुस्ती संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रसिध्द केलेल्या दि.२०/१/१९९१ रोजीच्या पुस्तिकेमधील सूचना.

**प्रस्तावना** :-

सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागातील स्थापत्य विषयक कामे करीत असतांना कामाची वर्गवारी करण्यात येते. या वर्गवारीनुसार किरकोळ दुरुस्ती, विशेष दुरुस्ती, विविक्षित दुरुस्ती यामध्ये विगतवारी करुन सर्व शासकीय इमारतीच्या दुरुस्ती व देखभालीचे कामे करण्यात येतात. तसेच इमारतींची नविन बांधकामे अस्तित्वातील इमारतींच्या जोते क्षेत्रफळामध्ये वाढ करण्याची कामे हाती घेऊन पुर्ण करण्यात येतात. इमारतींच्या छापील नोंदवही मध्ये या सर्व बांधकामांची व इमारतींसाठी करण्यात येणाऱ्या भांडवली स्वरुपाच्या दुरुस्तीच्या कामांची नोंद घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना शासनाने यापुर्वी वर नमुद केलेल्या शासन निर्णय/शासन परिपत्रकांद्वारे निर्गमित करण्यात आले आहेत. सदर नोंदवह्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्यालयी ठेवण्यात येतात. या नोंदवह्या सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये कायम स्वरुपी अभिलेख म्हणून जतन करण्यात येतात.

२. जनहित याचिका क्र.२८/२०१० च्या अनुषंगाने न्यायालयाने शासनाने काही बाबी स्पष्ट करावयाच्या सूचना दिलेल्या आहेत. याच अनुषंगाने नागपूर कंत्राटदार असोसिएशन यांनी शासनस्तरावर काही सुधारणा करण्याबाबत न्यायालयास सूचविले आहे. यासंदर्भात रिट याचिका क्र. २८/२०१० संदर्भात न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे शासनाच्या दिनांक २/१२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे अभ्यासगटाची नियुक्ती केली आहे. या अभ्यासगटाचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. या समितीने केलेल्या शिफारशीसंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसोबत दिनांक १२/३/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या शिफारशींवर सविस्तर विचारविनिमय करण्यात आला. बैठकीस उपस्थित सर्व मुख्य अभियंतांनी त्यांचे अभिप्राय बैठकीमध्ये नमूद केले. या बैठकीमध्ये सर्वानुमते समितीने केलेल्या शिफारशींमधील काही महत्त्वाच्या बाबींबाबत न्यायालयाच्या निर्देशांप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीत काही सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे :-

३. शासकीय इमारतीच्या दुरुस्ती व देखभालीची कामे केल्यानंतर तसेच इमारतींची बांधकामे व इमारतींच्या जोते क्षेत्रात वाढ करण्याची कामे केल्यानंतर त्यासंदर्भाने इमारतींच्या जोते क्षेत्रात झालेली वाढ व इमारतींच्या मुळ किमतींमध्ये झालेली वाढ याबाबतच्या नोंदी उपलब्ध कागदपत्रांच्या व नकाशांच्या आधारे करण्यात येऊन छापील इमारतींची नोंदवही अद्ययावत ठेवण्यात येते. यामुळे इमारतींच्या भांडवली स्वरुपाच्या दुरुस्तीची कामे प्रस्तावित करताना तसेच मंजूर करताना यापुर्वीच अशा प्रकारची कामे करण्यात आली आहेत का ? व या करण्यात आलेल्या कामांद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या सुविधांचे आयुष्यमान समाप्त झाले आहे का ? याबाबत पडताळणी करता येणे सुलभ होऊन कामे योग्यरितीने व विहित नियमांचे पालन करुन मंजूर करणे शक्य होते.

४. सद्यस्थितीत क्षेत्रीय स्तरावर सदर नोंदवही मध्ये आवश्यक नोंदी दुरुस्तीची कामे व इतर कामे केल्यानंतर करण्यात येत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सदर नोंदवह्या अद्ययावत नसल्याने काही कामे नियत आयुष्यमान समाप्त होण्याआधी पुन्हा प्रस्तावित करुन मंजूर करण्यात येतात. यामुळे शासनाचे मोठे आर्थिक नुकसानही होते. सदर नोंदवह्या अद्ययावत ठेवण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे आवश्यक झाले आहे.

वरील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने आणि परिच्छेद ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर इमारतींच्या छापील नोंदवही (P.R.B) अद्ययावत ठेवण्याच्या कार्यपध्दतीत सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

उपरोक्त बाबींचा विचार करुन शासन आता पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करीत आहे :-

इमारतींच्या छापील नोंदवह्या जतन करणे व अद्ययावत ठेवण्यासंदर्भात आता यापुढे खालील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी :-

१. प्रत्येक सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत जतन करण्यात आलेल्या इमारतींच्या छापील नोंदवह्या सध्या वापरात असलेल्या विहित नमुन्यामध्ये संगणकीकृत करुन जतन करण्यात याव्यात.

२. यापुर्वी इमारतींच्या बांधकामासंदर्भात व दुरुस्तीच्या संदर्भात करण्यात आलेल्या सर्व कामांच्या नोंदी सदर नोंदवहीत नमुद करण्याची जबाबदारी विभागाच्या कार्यकारी अभियंता यांची राहील. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित मंडळाच्या अधिक्षक अभियंता यांनी किमान वर्षातून एकदा एप्रिल ते जून दरम्यान सदर नोंदवह्यांची तपासणी करुन त्या अद्ययावत राहतील याची काळजी घ्यावी. दरवर्षी दुरुस्ती केलेल्या नोंदी अद्ययावत करुन सदर नोंदवहीची अद्ययावत Soft Copy ही PDF Format मध्ये विभागीय कार्यालयात जतन करुन ठेवावी आणि त्याची एक प्रत मंडळ कार्यालयास तसेच एक प्रत प्रादेशिक कार्यालयास पुढील वर्षाच्या दिनांक ३१ मे पर्यंत सादर करावी.

३. इमारतींच्या दुरुस्ती व देखभालीचे कार्यक्रम मंजूर करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कार्यक्रम मंजूरी पुर्वी संगणकीकृत इमारतीच्या छापील नोंदवही मधील तपशीलाची नोंद घेऊन व विहित नियमांचे पालन करुन संगणकीकृत प्रणालीमध्ये सादर केलेल्या मागील वर्षाच्या दुरुस्ती कार्यक्रमामध्ये अवलोकन करुन नवीन कार्यक्रम मंजूर करावा.

४. इमारतींच्या दुरुस्ती व देखभालीच्या कामांची व इतर कामांची देयके अदा करण्यापुर्वी सदर देयकातील तपशीलाची नोंद संगणकीकृत प्रणालीद्वारे इमारतीच्या छापील नोंदवही मध्ये

घेतल्याशिवाय देयके अदा करण्यात येऊ नयेत. अशी बाब आढळल्यास त्यासाठी संबंधित कार्यकारी अभियंता हे वैयक्तिकरित्या जबाबदार असतील.

उपरोक्त सूचनांचे पालन क्षेत्रीय स्तरावरील सर्व अधिकाऱ्यांनी/कर्मचाऱ्यांनी करणे आवश्यक आहे. या सूचनांप्रमाणे कार्यवाही न करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्या विरोधात उचित प्रशासकीय दंडनीय कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१३२३३८७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar Dinkar Sardeshmukh

Digitally signed by Vidyadhar Dinkar Sardeshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Dinkar Sardeshmukh
Date: 2015.08.04 13:27:05 +05'30'

**( वि.दि.सरदेशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
३. सर्व अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ
४. सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मुंबई
७. निवडनस्ती, इमारती-२ सा.बां.वि. मंत्रालय.